गोपनीय

तात्काळ

दिनांक १० फेब्रुवारी १९८८ पासून घातलेला सरकारी/निमसरकारी कर्मचारी व शिक्षक वगैरे यांचा बेमुदत संप...... कामकाज सुरळीत रहाण्याबाबत व्यवस्था.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक: एसटीके-१०८८/सीआर-५/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ९ फेब्रुवारी, १९८८.

## परिपत्रक

शासन परिपत्रक समक्रमांक दिनांक ५ फेब्रुवारी १९८८ च्या परिच्छेद क्र. १ व २ ऐवजी शासन सुधारीत आदेश खालीलप्रमाणे देत आहे.

मंत्रालयीन कार्यालये उघडण्याची व बंद करण्याची तसेच नोंदणी कक्षाचे काम संपकाळात सुरळीत चालविण्याची जबाबदारी मंत्रालयीन विभागाच्या प्रत्येक उप सचिव [आस्थापना] व अवर सचिव [आस्थापना] यांची आहे. त्याप्रमाणे संपकाळात मंत्रालयीन विभाग, कार्यालये उघडण्याची व बंद करण्याची जबाबदारी तसेच नोंदणी शाखेचे काम चालविण्याची व टपाल, तार स्वीकारण्याची आणि त्यांची नोंद घेऊन संबंधित अधिकाऱ्यांकडे पाठविण्याची तसेच तातडीच्या पत्राची निर्गमन करण्याची जबाबदारी उप सचिव [आस्थापना] व अवर सचिव [आस्थापना] यांच्यावर आहे व त्यांनी विभागातील इतर अधिकाऱ्यांच्या सहाय्याने ही कामे पार पाडावीत.

या विभागाच्या दिनांक ५ फेब्रुवारी ८८ च्या परिपत्रकाप्रमाणे मंत्रालयीन विभागातील अवर सचिव/सहायक सचिव यांचेकडे ही कामे विशिष्ट नामनिर्देशाने करून सुपूर्द करण्याबद्दल मंत्रालयीन विभागांनी आदेश काढले असतील तर कृपया ते आदेश तात्काळ रद्द करण्यात यावेत.

आदेशानुसार –

[ सु. रामकृष्ण ]
विशेष सचिव [सेवा]